महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी अंतर्गत विठ्ठल प्रतिष्ठान,निमगाव (टें),ता.माढा,जि.सोलापूर या संस्थेस मौजे मानेगाव,ता.माढा,जि.सोलापूर येथे कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावरील आर्या कृषि महाविद्यालय,मानेगाव हे नवीन कृषि महाविद्यालय सुरु करण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मफुवि-१४२३/प्र.क्र.१८०/७-अे,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक: २५/०८/२०२३

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम,१९८३.
२) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-१५१७/प्र.क्र.६०/७अे,दि.३०.०५.२०१८.
३)कृषि व पदुम विभाग,शासन निर्णय क्र.मकृप-१०२२/प्र.क्र.८९/७-अे,दि.०६.०५.२०२२.
४)महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचे जा.क्र.मकृप/शिक्षण-१/४५२३/ १९७/२४४०, दि.२३.०८.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना** :-

महाराष्ट्र कृषि विद्यापीठे अधिनियम,१९८३ च्या कलम १२(३)(ड) मधील तरतूदीनुसार कोणत्याही नवीन विद्याशाखा,पाठ्यक्रम किंवा ज्ञानशाखा किंवा विभाग सुरु करण्यासाठी, त्याचप्रमाणे, कोणत्याही अभ्यासक्रमासाठी जादा वैकल्पिक विषय सुरु करण्यासाठी विद्यापीठांना परवानगी देणे याबाबतचे अधिकार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेस प्रदान करण्यात आले आहेत. तसेच, कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय दि.३०.०५.२०१८ अन्वये कृषि विद्यापीठांतर्गत पदवी, पदव्युत्तर व आचार्य पदवी अभ्यासक्रमामध्ये जागांचे आरक्षण, सामाजिक आरक्षणाच्या वाटपाची कार्यपध्दती, प्रवेश कार्यपध्दती निश्चित करणेबाबत व खाजगी कृषि महाविद्यालयांना मान्यता देण्याच्या कार्यवाहीबाबत सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत.

महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांनी कृषि परिषदेच्या कार्योत्तर मान्यतेच्या अधिन महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी अंतर्गत “**विठ्ठल प्रतिष्ठान,निमगाव (टें),ता.माढा, जि.सोलापूर”** या संस्थेस **मौजे मानेगाव,ता.माढा,जि.सोलापूर** येथे कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावर **आर्या कृषि महाविद्यालय,मानेगाव** या नावाने नवीन कृषि महाविद्यालय सुरु करण्यास मान्यता प्रदान करण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र.४ अन्वये सादर केलेला आहे. त्यासअनुसरुन, “**विठ्ठल प्रतिष्ठान,निमगाव (टें),ता.माढा,जि.सोलापूर”** या संस्थेस **मौजे मानेगाव,ता.माढा,जि.सोलापूर** येथे कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावरील आर्या कृषि महाविद्यालय,मानेगाव हे नवीन कृषि महाविद्यालय सुरु करण्यास मान्यता देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी अंतर्गत "**विठ्ठल प्रतिष्ठान,निमगाव (टें), ता.माढा, जि.सोलापूर**" या संस्थेला **मौजे मानेगाव,ता.माढा,जि.सोलापूर** येथे ६० विद्यार्थी प्रतिवर्ष प्रवेश क्षमता असलेले खाजगी कायमस्वरुपी विनाअनुदानित तत्त्वावरील **आर्या कृषि महाविद्यालय,मानेगाव, ता.माढा,जि.सोलापूर** हे नवीन कृषि महाविद्यालय सुरु करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे. तसेच,पदवी अभ्यासक्रमाची प्रवेश प्रक्रिया सन २०२३-२४ या शैक्षणिक वर्षापासून सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. <u>अटी व शर्ती</u>-

i. सदर मान्यता ही कायमस्वरुपी विनाअनुदान तत्त्वावर राहील.
ii. सदर महाविद्यालयाने विद्यापीठ तपासणी समितीच्या अहवालातील निष्कर्षांत नमूद बाबींची/ त्रुटींची पूर्तता विहीत कालावधीत करावी.
iii. सदर व्यावसायिक पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, प्रवेश नियामक प्राधिकरण,महाराष्ट्र राज्य,मुंबई व शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमांच्या प्रवेश नियमानुसार करण्यात येतील.
iv. पदवी अभ्यासक्रमांची शुल्क निश्चिती, शुल्क नियामक प्राधिकरण,महाराष्ट्र राज्य,मुंबई व शासनाने वेळोवेळी निर्देशीत केलेल्या प्राधिकरणामार्फत विहीत करण्यात येईल.
v. शिक्षण विषयक कार्यप्रणाली यांचे संनियंत्रण करण्याचे अधिकार, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांना राहतील. तसेच,राज्य शासनाने वेळोवेळी निश्चित केलेली मार्गदर्शक तत्त्वे व निकष खाजगी विनाअनुदानित पदवी अभ्यासक्रमासाठी लागू राहतील.
vi. नवीन विनाअनुदानित कृषि व संलग्न महाविद्यालय सुरु करण्यासाठी,कृषि परिषद/कृषि विद्यापीठ यांच्याकडे प्रक्रिया शुल्क/बँक गॅरंटी/अनामत रक्कम जमा करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.
vii. महाविद्यालयाची संलग्नता, तपासणी व मूल्यांकनासाठी भारतीय कृषि अनुसंधान परिषद,नवी दिल्ली, राज्यशासन व संबंधित कृषि विद्यापीठ/कृषि परिषद यांचे मार्फत वेळोवेळी निश्चित केलेले निकष व मार्गदर्शक तत्त्वे बंधनकारक असतील.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०८२९१५०२३०६४०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2023.08.29 15:05:28 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मा.मुख्यमंत्री सचिवालय,मंत्रालय,मुंबई.

३) मा.मंत्री (कृषि),कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.

४) महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.

५) कुलगुरु/कुलसचिव,महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी,ता.राहुरी,जि.अहमदनगर.

६) अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक,कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.

७) विठ्ठल प्रतिष्ठान,निमगाव (टें),ता.माढा,जि.सोलापूर यांना महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचेमार्फत.

८) महालेखापाल,महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर.

९) निवडनस्ती (कार्यासन ७-अे),कृषि व पदुम विभाग,मंत्रालय,मुंबई.